**जलसंपदा विभागातील सचिव व सचिव समकक्ष दर्जाचे कार्यकारी संचालक/ महासंचालक या संवर्गाची दि.०१.०१.२०२३ रोजीची तात्पुरती ज्येष्ठता यादी प्रसिध्द करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक : कासंज्ये १४२३/प्र.क्र.८५/२०२३/ आ(वर्ग-१)**

मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक: १५ जून, २०२३.

संदर्भ :

१) महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली,२०२१.

२) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: कासंज्ये १४२२/प्र.क्र.११८/२०२२/ आ(वर्ग-१), दि.०९.०५.२०२२.

शासन परिपत्रक :

महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१ अन्वये शासन सेवेतील अधिकारी /कर्मचाऱ्यांची ज्येष्ठतायादी प्रत्येक वर्षी तयार करणे व प्रसिध्द करणे यांबाबतचे सर्वंकष धोरण/नियम निश्चित करण्यात आले आहे. त्यानुसार संदर्भ क्र.२ येथील दि.०९.०५.२०२२ रोजीच्या परिपत्रकान्वये जलसंपदा विभागातील सचिव व सचिव समकक्ष दर्जाचे कार्यकारी संचालक/ महासंचालक या संवर्गाची दि.०१.०१.२०२२ रोजीची तात्पुरती ज्येष्ठता यादी प्रसिद्ध करण्यात आली आहे.

२. आता, सदर संवर्गाची दि.०१.०१.२०२३ रोजीची तात्पुरती ज्येष्ठता यादी सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्र.१ अन्वये निश्चित केलेल्या धोरणानुसार सोबत जोडलेल्या **परिशिष्ट-अ** प्रमाणे प्रसिध्द करण्यात येत आहे.

३. सचिव व सचिव समकक्ष दर्जाच्या कार्यकारी संचालक /महासंचालक संवर्गाची दि.०१.०१.२०२३ रोजीची सदर तात्पुरती ज्येष्ठतायादी ही मा.उच्च न्यायालयाने याचिका क्र.२७९७/ २०१५ वर दिलेल्या न्यायनिर्णयानुसार तसेच यासंदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयामध्ये दाखल केल्या गेलेल्या व प्रलंबित असलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ वरील अंतिम न्यायनिर्णयाच्या अधीन राहून प्रसिध्द करण्यात येत आहेत. उपरोक्त न्यायालयीन प्रकरणांमधील अंतिम न्यायनिर्णयानुसार सन २००४ नंतरच्या निवडसूच्यांमध्ये बदल झाल्यास त्यानुसार ज्येष्ठतायादीमध्ये बदल होईल.

**४.** सदर ज्येष्ठता यादीबाबत काही त्रुटी/आक्षेप असल्यास हे परिपत्रक निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून १५ दिवसांच्या आत लेखी स्वरुपात आवश्यक त्या कागदपत्रांसह विहित मार्गाने शासनाच्या निदर्शनास आणाव्यात.

**५.** सदर शासन परिपत्रक व ज्येष्ठतासूची महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०६१९१५१३४९२१२७ असा आहे. तसेच सदरचे शासन परिपत्रक जलसंपदा विभागाच्या wrd.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर देखील उपलब्ध करण्यात आले आहे. संबंधितांनी तेथून त्याची प्रत प्राप्त करुन घ्यावी. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

UDDHAV R
DAHIPHALE

Digitally signed by UDDHAV R DAHIPHALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=05b3ca49b9a0a924fd4d8743e6e254e742308f02108527986e098afc27201f30, pseudonym=DDF7D61D2ADB9D0A26CF5E52D408A84E1CEB62A8, serialNumber=2D80774C9ED65ECA9BE69006934BFB5C4CA32AB0DC1A2EC5746398458BDF1C37, cn=UDDHAV R DAHIPHALE
Date: 2023.06.19 15:15:50 +05'30'

**( उद्धव दहिफळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**सोबत : परिशिष्ट अ**

**प्रत,**

१. मा. उपमुख्यमंत्री (जलसंपदा) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
२. अ.मु.स.(जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव (लाक्षेवि/ प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. महासंचालक/ सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
५. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
६. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
७. कार्यासन आ(वर्ग-१) संग्रहार्थ.

# परिशिष्ट-अ

शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, क्रमांक कासंज्ये १४२३/प्र.क्र.८५/२०२३/आ(वर्ग-१), दि.१५.०६.२०२३ सोबतचे परिशिष्ट

संवर्गाचे नाव:- सचिव व सचिव समकक्ष - कार्यकारी संचालक/ महासंचालक संवर्ग

वेतनश्रेणी:- S३० (१४४२००-२१८२००)

दि.०१ जानेवारी, २०२३ रोजीची तात्पुरती ज्येष्ठतासूची.

| अ.क्र. | ज्येष्ठता क्रमांक | अधिकाऱ्याचे नाव (सर्वश्री) | नियुक्तीचा मार्ग | जन्मदिनांक | प्रवर्ग | नियम३ (२) नुसार संवर्गात प्रत्यक्ष रुजू दिनांक | ज्येष्ठतेचा दिनांक/ मानीव दिनांक | सेवा निवृत्तीचा दिनांक | शैक्षणिक अर्हता | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| १ | १ | श्री.राजेंद्रकुमार दत्ताजीराव मोहिते | पदोन्नती | ०२.११.१९६५ | खुला | १४.०१.२०२१ | १३.०१.२०२१ | ३१.११.२०२३ | बी.ई. (स्था) | |
| २ | २ | श्री.किरण भालचंद्र कुलकर्णी | पदोन्नती | २१.०७.१९६४ | खुला | १३.०१.२०२१ | १३.०१.२०२१ | ३१.०७.२०२२ | बी.ई. (स्था.) | सेवानिवृत्त |
| ३ | ३ | श्री.बसवंत शंकरप्पा स्वामी | पदोन्नती | ०५.०१.१९६४ | खुला | ०२.०९.२०२१ | ------------ | ३१.०१.२०२२ | बी.ई. (स्था) | सेवानिवृत्त |
| ४ | ४ | श्री.राजनकुमार रसिकलाल शहा | पदोन्नती | ०१.०६.१९६५ | खुला | ०३.०९.२०२१ | ०२.०९.२०२१ | ३१.०५.२०२३ | एम. टेक (स्था.) | |
| ५ | ५ | श्री.विलास गिरीधारीसिंह राजपूत | पदोन्नती | १६.१०.१९६४ | वि.जा.अ. | ०३.०९.२०२१ | ०३.०९.२०२१ | ३१.१०.२०२२ | बी.ई. | सेवानिवृत्त |
| ६ | ६ | श्री.प्रमोद गोविंदराव मांदाडे | पदोन्नती | ०८.०३.१९६७ | इ.मा.व. | ०१.१२.२०२२ | ०१.१२.२०२२ | ३१.०३.२०२५ | बी.ई.(स्था.) | |
| ७ | ७ | डॉ. संजय मधुकर बेलसरे | पदोन्नती | ०६.०६.१९६८ | इ.मा.व. | १५.१२.२०२२ | ०१.१२.२०२२ | ३०.०६.२०२६ | एम.ई.पी.एच.डी. | |
| ८ | ८ | श्री.संतोष रामकिशन तिरमनवार | पदोन्नती | २५.०४.१९६८ | खुला | ०१.१२.२०२२ | ०१.१२.२०२२ | ३०.०४.२०२६ | बी.ई.(स्था.) | |
| ९ | ९ | श्री.अतुल अशोक कपोले | पदोन्नती | ०८.०२.१९६८ | खुला | ०१.१२.२०२२ | ०१.१२.२०२२ | २८.०२.२०२६ | एम.ई.(स्था.) | |